**भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कार्यकक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट-ब (अराजपत्रित) व गट-क पदे सरळसेवेने भरताना महापरीक्षा पोर्टल पध्दतीत बदल करुन सुधारीत परीक्षा <u>पध्दतीचा वापर करण्याबाबत..</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: प्रानिमं १२२०/प्र.क्र.२१/१३-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १७ ऑगस्ट, २०२०.

**<u>संदर्भ:</u>** -
१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान) क्रमांक: मातंसं-०८८/२७/२०१६-DIR IT (MH), दिनांक १९ सप्टेंबर, २०१७
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: प्रानिमं १२१८/प्र.क्र.२७/१३-अ, दिनांक १४ मार्च, २०१८
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: प्रानिमं १२१६/(प्र.क्र.६५/१६)/१३-अ, दिनांक १३ जून, २०१८
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान) क्रमांक: मातंस-२०२०/प्र.क्र.११/से-२/३९, दिनांक २० फेब्रुवारी, २०२०
५) शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान) क्रमांक :मातंस-२०२०/प्र.क्र.११/से-२/३९, दिनांक २४ फेब्रुवारी, २०२०.

**<u>प्रस्तावना</u>: -**

भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कार्यकक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील रिक्त पदे सरळसेवेने भरण्यासाठी जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा निवड समित्या, प्रादेशिक विभाग प्रमुखांच्या अध्यक्षतेखाली प्रादेशिक निवड समित्या तसेच विभाग प्रमुखांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय निवड समित्यांची स्थापना करण्यात आलेली आहे. सदर पदभरतीची सर्वसमावेशक कार्यपद्धती संदर्भाधीन दिनांक १३ जून, २०१८ च्या शासन निर्णयान्वये विशद करण्यात आली आहे.

सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १९ सप्टेंबर, २०१७ च्या शासन निर्णयान्वये पदभरतीची प्रक्रिया राबविताना महापरीक्षा पोर्टलचा वापर करणे अनिवार्य करण्यात आले होते. त्यानुसार भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कार्यकक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील पदभरती प्रक्रिया महापरीक्षा पोर्टलद्वारे राबविण्यासंदर्भात सविस्तर सूचना संदर्भाधीन दिनांक १४ मार्च, २०१८ च्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत.

आता सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभागाने संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २० फेब्रुवारी, २०२० व शासन शुध्दीपत्रक दिनांक २४ फेब्रुवारी, २०२० अन्वये, दिनांक १९ सप्टेंबर, २०१७ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन, शासनाच्या विविध विभागांच्या गट-क व गट-ड च्या पदभरती संदर्भात परीक्षा प्रक्रिया राबविण्याकरिता महाआयटीकडून Empanelment केल्या जाणाऱ्या OMR Vendor (Service Provider) मार्फत कार्यवाहीच्या सूचना निर्गमित केल्या आहेत.

सदर सूचनांच्या अनुषंगाने भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कार्यकक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील पदभरतीसंदर्भात "महापरीक्षा पोर्टल" चा वापर करण्याबाबतचे या विभागाचे संदर्भाधीन दिनांक १४ मार्च, २०१८ चे परिपत्रक देखील याद्वारे अधिक्रमित करण्यात येत असून, परीक्षाप्रक्रिया राबविण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे सुधारीत सूचना देण्यात येत आहेत :-

**<u>शासन परिपत्रक:-</u>**

भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कार्यकक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील पदभरतीच्या प्रक्रियेसंदर्भात असे आदेश देण्यात येत आहेत की, संबधित जिल्हा निवड समित्या, प्रादेशिकस्तरीय निवडसमित्या तसेच राज्यस्तरीय निवडसमित्यांनी पदभरती प्रक्रियेबाबतच्या स्पर्धा परीक्षांसाठी यापुढे सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभागाच्या दिनांक २० फेब्रुवारी, २०२० च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार महाआयटीमार्फत Empanelment केलेल्या Vendor च्या यादीतून एका OMR Vendor (Service Provider) ची निवड करुन परीक्षा प्रक्रिया पार पाडाव्यात. याकरिता संबंधित निवड समित्यांना समन्वय समिती (Nodal Agency) तसेच निवड समितीच्या अध्यक्षांना समन्वय अधिकारी (Nodal Officer) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. निवड समितीच्या अध्यक्षांना आवश्यकतेनुसार हे अधिकार निवड समितीतील कोणत्याही अधिकाऱ्यास प्रदान करता येतील.

२. पदांची जाहिरात, निवडप्रक्रिया ते अंतिम निवड यादी प्रसिध्द करणे या परीक्षा प्रक्रियेच्या संचालनाची जबाबदारी संबंधित निवड समितीची राहील. Empanelment मधून निवड करुन घेतलेल्या OMR Vendor (Service Provider) कडून संबंधित निवड समित्यांनी पदभरतीसाठीची प्रक्रिया राबवून परीक्षा आयोजित कराव्यात.

३. उमेदवारांकडून स्पर्धा परीक्षांचे अर्ज स्वीकारणे, परीक्षा शुल्क स्वीकारणे, ते तपासणे, त्यावर योग्य ती प्रक्रिया करुन परीक्षेचे प्रवेशपत्र तयार करणे, परीक्षेचा निकाल तसेच शिफारस झालेल्या/न झालेल्या उमेदवारांच्या यादया प्रसिध्द करणे इत्यादी कामांसाठी संबंधित निवड समित्यांनी OMR Vendor (Service Provider) यांच्याबरोबर योग्य तो करारनामा /सामंजस्य करार (Memorandum of Understanding) करणे आवश्यक राहील. करारनाम्यासंदर्भात विस्तृत सूचना माहिती व तंत्रज्ञान विभाग/संचालनालयाशी विचारविनिमय करुन Empanelment झाल्यावर त्याअनुषंगाने देण्यात येतील.

४. संबंधित पदांच्या पदभरतीसंदर्भात परीक्षांचे अभ्यासक्रमानुसार सुयोग्य प्रश्नपत्रिका तज्ञ व्यक्तींकडून तयार करून घेणे व परीक्षार्थींचे संख्येच्या प्रमाणात प्रश्नसंच /उत्तरपत्रिका तयार करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा/ प्रादेशिक/राज्य निवडसमित्यांच्या अध्यक्षांची राहील.

५. हे आदेश निर्गमित होण्यापूर्वी, ज्या प्रकरणी जाहिरात प्रसिध्द होऊन निवडप्रक्रिया सुरु करण्यात आली आहे अथवा परीक्षांचे आयोजन होणे बाकी आहे अशा सर्व प्रकरणी निवड केलेल्या OMR Vendor (Service Provider)कडून पुढील कार्यवाही पूर्ण करण्यात यावी. यासाठी त्या त्या संबंधित निवडसमित्यांना सर्व आवश्यक माहिती महाआयटीकडून हस्तांतरीत करण्यात येईल.

६. निवड समित्यांच्या अध्यक्षांनी (विभाग प्रमुख/प्रादेशिक विभाग प्रमुख/जिल्हाधिकारी यांनी) OMR Vendor (Service Provider) बरोबर होणारा करार व त्यांच्याशी संबंधित स्पर्धा परीक्षेच्या आयोजनाकरिता होणाऱ्या एकूण खर्चाची तरतूद/वाढीव तरतूद त्यांच्या कार्यालयीन अंदाजपत्रकात करुन सदर खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. **मात्र, संदर्भाधीन दिनांक १३ जून, २०१८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.६ येथे नमूद परीक्षा शुल्क दर कायम राहतील.**

७. सुधारीत कार्यपद्धतीनुसार केल्या जाणाऱ्या वरील कार्यवाहीसंदर्भात काही आक्षेप उद्भवल्यास, त्याचे निराकरण करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा निवड समिती/प्रादेशिक निवड समिती/ राज्यस्तरीय निवड समितीच्या अखत्यारीत येत असल्यास, त्या संबंधित निवडसमितीची राहील व पदभरतीसंदर्भांत उद्भवणाऱ्या तांत्रिक बाबींविषयी सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान)/महाआयटी मार्फत सल्ला पुरविण्यात येईल . पदभरती कालावधीत परीक्षांबाबतच्या तक्रारी निराकरण करण्यासाठी “तक्रार निवारण कक्ष” स्थापन करण्यात यावा.

८. भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कार्यकक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) सरळसेवा भरतीसाठी सामान्य प्रशासन विभागाने विहित केलेल्या कार्यपद्धतीपेक्षा वेगळी कार्यपद्धती काही मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी विहित केलेली आहे. (उदा. शिक्षणसेवक (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग), पोलीस शिपाई (गृह विभाग), कृषि सेवक (कृषि व पदुम विभाग), कंत्राटी ग्रामसेवक (ग्रामविकास व जलसंधारण विभाग), अंगणवाडी सेविका (महिला व बालविकास विभाग), आरोग्य सेवक (सार्वजनिक आरोग्य विभाग), नगरपालिका/मनपा इत्यादीमधील अराजपत्रित पदांवरील सरळसेवा भरती (नगर विकास विभाग) इत्यादी). असे संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग तसेच राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्था व राज्य शासनाच्या अधिपत्त्याखालील सर्व सार्वजनिक उपक्रम, मंडळे, महामंडळे, संचालनालये त्यांच्याशी संबंधित पदभरतीसाठी प्रस्तुत सुधारीत परीक्षा पध्दतीचा पर्याय स्वीकारु शकतील.

**९. सदर सुधारीत आदेशांमुळे संदर्भांधीन दिनांक १३ जून, २०१८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.५ याद्वारे रद्द करण्यात येत आहे. तसेच सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.३ (५) येथील "त्याकरीता संदर्भ क्र.११ येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान) दिनांक १९/०९/२०१७ मधील निर्देशांनुसार कार्यवाही करण्यात यावी " ही तरतूद तसेच परिच्छेद क्र. २० येथील " तसेच, स्पर्धा परीक्षेच्या आयोजनासंदर्भात काही अडचणी/वाद उद्भवल्यास ....." ही तरतूद रद्द करण्यात येत आहे. दिनांक १३ जून, २०१८ च्या शासन निर्णयातील इतर तरतूदींत कुठलाही बदल नसून त्या ( शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टांसह ) यापुढे यथास्थिती लागू राहतील.**

१०. शासनाच्या उपरोक्त निर्देशांची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्याची सर्व जबाबदारी सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांची राहील.

**११. हे आदेश शासन परिपत्रक निर्गमित होण्याच्या दिनांकापासून तात्काळ अंमलात येतील.**

१२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२००८१७१७०१३९२००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rahul Vijay Kulkarni

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, serialNumber=31493d4a6291f531ed8fd00972ccbfa0376623c7f6c38c3b848bfbe06685a219, cn=Rahul Vijay Kulkarni
Date: 2020.08.17 17:12:50 +05'30'

**(रा.वि.कुलकर्णी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई
सर्व मा.संसद सदस्य, मा.विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना)-
त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.
*प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
*प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई
*राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
*सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर
*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

मुख्य लेखापरीक्षक (निवासी लेखे), कोकण भवन, नवी मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ प्रादेशिक विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख
मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
*पत्राने

*****